राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन देण्यासाठी निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र-४०२३/प्र.क्र.१५३/क्रीयुसे -२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २४ मे, २०२४.

वाचा

१. शासन निर्णय समाजकल्याण सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र -सेनिवे-१०९१/प्र.क्र.८२/क्रीयुसे -१,दिनांक १० जून, १९९३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडायो २०१२/प्र.क्र.६४/१२/क्रीयुसे-२, दि. २१.१२.२०१२.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडायो २०१२/प्र.क्र.६४/१२/क्रीयुसे-२, दि.०२.११.२०२३.
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. ववृखेमा/नि.वि.प्रस्ताव/२०२३-२४/का.६/२७४४, दि. ०७.०३.२०२४

प्रस्तावना -

राज्य/राष्ट्रीय/आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन देण्याची योजना संदर्भ क्र. (१) येथील दि.१० जून, १९९३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. राष्ट्रीय /आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना तसेच किताब प्राप्त कुस्तीगीरांना देण्यात येणाऱ्या मानधनाचे दर संदर्भ क्र. (२) येथील दि. २१ डिसेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये सुधारित केले आहेत.

२. सन २०२३-२४ या वर्षात एकूण पात्र ११४ लाभार्थी वयोवृध्द खेळाडूंना एप्रिल, २०२३ ते सप्टेंबर, २०२३ या कालावधीतील मानधन व काही खेळाडूंची मागील थकबाकी अदा करण्यासाठी रु.२८,२१,५००/- लक्ष इतका निधी संदर्भ क्र ३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे.

३. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात एकूण पात्र ११२ लाभार्थी वयोवृध्द खेळाडूंना ऑक्टोबर,२०२३ ते मार्च, २०२४ पर्यंतचे मानधन अदा करण्यासाठी निधी मंजूर करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. ४ अन्वये शासनास सादर केला आहे.

४. राज्य / राष्ट्रीय / आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना ऑक्टोबर,२०२३ ते मार्च, २०२४ पर्यंतचे मानधन देण्यासाठी निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील एकुण ११२ पात्र लाभार्थी वयोवृध्द खेळाडूंना ऑक्टोबर,२०२३ ते मार्च, २०२४ पर्यंतचे मानधन अदा करण्यासाठी रु.२६,३७,०००/- लक्ष (रुपये सव्वीस लाख सदतीस हजार फक्त ) इतकी रक्कम मंजूर करण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ (०८)(०२) राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या नामवंत खेळाडूना मानधन (२२०४-१६५८), ३१ सहायक अनुदाने वेतनेतर" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मधील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेअंतर्गत वयोवृध्द खेळाडूंना मानधन मंजूर करतांना संदर्भाधीन शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी/लेखाधिकारी,क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौ.सं.क.५५५/ २०२४/व्यय-५,दि.०७.०५.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५२४१७१३१९८१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2024.05.24 17:26:25 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.

२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा,उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव
५. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
८. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
११. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
१४. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१६. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१७. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१८. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. निवड नस्ती (क्रीयुसे-२).